अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थीनींकरिता बांधण्यात आलेल्या वसतीगृहांचे व्यवस्थापन संबंधित शासकीय संस्थांना सोपविणेबाबत .

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वसगृ-२०१५/प्र.क्र.७१/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः ११ मे, २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. मौआम-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.२.०३.२०१०

२) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.२१ जून, २०१३

३) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.०५ सप्टेंबर, २०१४

४) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. बियुडी-२०१०/प्र.क्र.४६/का.७, दि.०८.०३.२०११

५) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१२/प्र.क्र.७६/१२/का.७, दि.१४.०८.२०१२

६) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१२/प्र.क्र.२१९/१२/का.७, दि.२८.०३.२०१३

७) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१२/प्र.क्र.२१९/१२/का.७, दि.३०.०३.२०१३

८) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१२/प्र.क्र.२२७/२०१२/का.७, दि.१७.०८.२०१३

**प्रस्तावना -**

११ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासन पुरस्कृत बहुक्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) राज्यतील परभणी, वाशिम आणि हिंगोली जिल्हयात प्रत्येकी ०२ याप्रमाणे मुलींची एकूण ०६ वसतीगृहे बांधण्यासाठी केंद्र व राज्यशासनाकडून निधी देण्यात आला होता. तसेच राज्य शासन योजनेअंतर्गत औरंगाबाद, परभणी व अमरावती या जिल्हयामध्ये प्रत्येकी ०१ अशी एकूण ०३ वसतीगृहे बांधण्यासाठी निधी देण्यात आला होता. या सर्व वसतीगृहांचे बांधकाम पूर्णत्वास आले आहे. सदरहू ०९ वसतीगृहांचे व्यवस्थापन जवळपासच्या शासकीय संस्थांकडे सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

११ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासन पुरस्कृत बहुक्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) व राज्यशासन योजनेअंतर्गत पूर्णत्वास आलेल्या खालील वसतीगृहांचे व्यवस्थापन त्याच्या समोर दर्शविण्यात आलेल्या शासकीय संस्थेकडे याव्दारे सोपविण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वसतीगृहाचे ठिकाण | पत्ता | वसतीगृहाचे व्यवस्थापन सोपविण्यात येत असलेल्या शैक्षणिक संस्था |
|---|---|---|---|
| राज्य योजना अंतर्गत | | | |
| १ | शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद | शासकीय विज्ञान संस्था आवार, निपट निरंजन मार्ग, लेणी मार्ग, औरंगाबाद-४३१००४ | संचालक, शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद |
| २ | पूर्णा, जि. परभणी | मौजे आडगाव, ता. पूर्णा, जि. परभणी-४३१५११ | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पूर्णा |
| ३ | अमरावती | शासकीय विदर्भ ज्ञान-विज्ञान संस्था आवार, व्हीमव्ही रोड, अमरावती - ४४४ ६०४ | संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान-विज्ञान संस्था, अमरावती |
| केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रम (MsDP) अंतर्गत | | | |
| ४ | गंगाखेड, जि. परभणी | शासकीय औद्योगिक संस्था परिसर, सर्व्हे नं. ५७६, भूखंड क्र.३, जिंतूर रोड, परभणी, ता. जि. परभणी - ४३१५१४ | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, गंगाखेड |
| ५ | हिंगोली, जि. हिंगोली | शासकीय तंत्रनिकेतन महाविद्यालयासमोर, जिल्हा क्रिडा संकुलाच्या बाजूला, खुराणा जिनिंग मिलजवळ, भूखंड क्र.०९, मौजे-निबांळा (मक्ता), ता. जि. हिंगोली-४३१५१३. | प्राचार्य,शासकीय तंत्रनिकेतन, हिंगोली |
| ६ | वसमत, जि. हिंगोली | शासकीय औद्योगिक संस्था परिसर, नवोदय विद्यालयासमोर, परभणी रोड, मौजे बसमत, जि. हिंगोली-४३१५१२. | प्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसमत |
| ७ | परभणी, जि. परभणी | शासकीय औद्योगिक संस्था परिसर, सर्व्हे न.५७६, भूखंड क्र.३, जिंतूर रोड, परभणी, जि. परभणी -४३१४०१ | प्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, परभणी |
| ८ | वाशिम, जि. वाशिम | सिटी सर्व्हे नं.३५,३६, भूखंड क्र.४३/१, सिव्हील लाईन्स, वाशीम, ता.जि. वाशीम-४४४५०५ | प्राचार्य,शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम |
| ९ | मंगळूरपीर, जि. वाशिम | सर्व्हे नं. ०४, मौजे-तुळजापूर, ता. मंगळूरपीर, जि. वाशिम, ४४४४०३ | प्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मंगळूरपीर |

सदर वसतीगृहे माहे जून, २०१५ मध्ये कार्यान्वित करण्याच्यादृष्टीकोनातून संबंधित जिल्हाधिकारी तसेच सार्वजनिक बांधकाम विभागातील संबंधित अधिकारी यांचेशी संबंधित प्राचार्य/संचालक यांनी समन्वय साधावा. संबधित प्राचार्य व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी संयुक्तरित्या वसतीगृहाची पाहणी करून वसतीगृहाचा ताबा घ्यावा.

या विभागाच्या दि.२१ जून, २०१३ व दि.०५ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयांअन्वये वसतीगृहांच्या व्यवस्थापनाबाबत व आकारण्यात येणाऱ्या शुल्काबाबत सविस्तर सूचना निर्गमित

करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार संबंधित प्राचार्य/संचालक यांनी वसतीगृहांच्या व्यवस्थापन करण्याची कार्यवाही करावी.

संबंधित प्राचार्य / संचालक यांनी नजिकच्या परिसरातील तसेच जिल्हयातील सर्व तंत्रनिकेतने/ महाविद्यालये/ उच्च शिक्षण देणाऱ्या संस्था यांना या वसतिगृहाच्या उपलब्धतेबाबत अवगत करावे. तसेच या महाविद्यालयाच्या/संस्थांच्या माहितीपुस्तकात वसतीगृहाबाबतची संपूर्ण तपशिलवार माहितीचा समावेश करण्याबाबत आवश्यक ती उचित कार्यवाही करावी.

संबंधित प्राचार्य / संचालक यांनी या विभागाच्या दिनांक २ मार्च, २०१० रोजीच्या शासन निर्णयाव्दारे विहित करण्यात आलेल्या आरक्षणाचे पालन करुन प्रवेशाची कार्यपध्दती पार पाडावी. तसेच, त्यात देण्यात येणाऱ्या प्रवेशाबाबत शासनास वेळोवेळी अवगत करावे.

सदर शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११/२०१५/मशि-२, दिनांक ६ मे, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१११५३११९१७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: CN = Ainul C Attar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.05.11 16:30:51 +05'30'

**( अैनुल अत्तार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व परीक्षा), नागपूर
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४) खाजगी सचिव, मा.मंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई .
५) खाजगी सचिव,मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई .
६) विभागीय आयुक्त, औरंगाबाद
७) विभागीय आयुक्त, अमरावती
८) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, औरंगाबाद.
९) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी.
१०) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती.
११) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, हिंगोली.
१२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम.

१३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई
१४) संचालक, शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद, जि. औरंगाबाद
१५) संचालक, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पूर्णा, जि.परभणी
१६) शासकीय विदर्भ ज्ञान-विज्ञान संस्था, अमरावती, जि. अमरावती.
१७) औद्योगिक प्रशिक्षण संस्था, गंगाखेड, जि. परभणी.
१८) शासकीय तंत्रनिकेतन, हिंगोली, जि. हिंगोली.
१९) औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसमत, जि. हिंगोली.
२०) औद्योगिक प्रशिक्षण संस्था, परभणी.
२१) शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम, जि. वाशिम.
२२) औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मंगरुळपीर, जि. वाशिम
२३) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जागतिक बँक प्रकल्प विभाग, औरंगाबाद
२५) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१४, व्यय-४), मंत्रालय, मुंबई
२६) नियोजन विभाग (कार्या. १४७५)
२७) निवड नस्ती (का-८).